**राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी सवर्साधारण घटकासाठी केंद्र हिश्श्याचे अनुदान वितरीत करण्याबाबत...(२२१५ ९७९१)**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: राग्रापे-२०१७/प्र.क्र.७०(एलबी-१)/पापु-१०**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, सातवा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, क्रॉफर्ड मार्केटजवळ, मुंबई-४०० ००१.
दिनांक: २४.०८.२०१८

वाचा-

१. शासन निर्णय क्रमांक: पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४(अ)/पापु-७, दिनांक १७ मार्च, २०१०.
२. केंद्र शासनाचे पत्र क्र.W-११०२०/१९७/२०१५-Water-I/१५०, दिनांक १५.३.२०१८.

प्रस्तावना-

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम या केंद्र पुरस्कृत कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाकडून सर्वसाधारण घटकासाठी प्राप्त झालेल्या केंद्र हिश्श्याच्या अनुदानांतर्गत आर्थिक वर्ष २०१८-१९ मध्ये मागणी क्र. वाय-०२, लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, ०२ जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२) (०२५) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (केंद्र हिस्सा) यासाठी अनुदाने, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ ९७९१) या लेखाशिर्षाखाली सर्वसाधारण घटकासाठी सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात केंद्र शासनाकडून उपरोक्त वाचा येथील (२) अन्वये प्राप्त झालेला निधी राज्याच्या एकत्रित निधीत आर्थिक वर्षाच्या अखेरीस दिनांक १६ मार्च, २०१७ रोजी जमा झाल्याचे वित्त विभागाने अभिप्राय दिले आहे. सदरचा निधी सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात अखेरीस प्राप्त झालेला परंतू अखर्चित राहीलेला निधी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात जिल्हा परिषद, कोल्हापूर यांना अनुदान मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय-

२. आर्थिक वर्ष २०१८-१९ मध्ये नळ पाणी पुरवठा योजनांकरीता उपरोक्त घटकांसाठी २२१५ ९७९१ या लेखाशिर्षांतर्गत रु. ६.८९०२५ कोटी (अक्षरी रुपये- सहा कोटी एकोणनव्वद लक्ष दोन हजार पाचशे मात्र) एवढे अनुदान सर्वसाधारण घटकांतर्गत कव्हरेज या घटकासाठी जिल्हा परिषद, कोल्हापूर यांना अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर (BEAMS) मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

अटी-

१) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, यांनी हे अनुदान राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत हाती घेतलेल्या भौतिक दृष्ट्या पूर्ण परंतु आर्थिक दृष्ट्या अपूर्ण गावे/वाड्यातील योजना पूर्ण करण्यासाठी खर्च करावयाचे आहे. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, यांनी सदर अनुदान खर्च करतांना फ्लोराईड/आर्सेनिकग्रस्त गावे/वाड्यामधील योजना, संसद आदर्श ग्राम योजनेमधील गावातील योजना, हागणदारीमुक्त गावातील योजना पूर्ण करण्यासाठी प्राथम्याने खर्च करण्यात यावे.
२) सदर अनुदान सर्वसाधारण घटकांतर्गत पाणी पुरवठा योजना राबविण्यासाठी या घटकाच्या निश्चित वार्षिक कृती आराखड्यात उपरोक्त घटकांसाठी समाविष्ट असलेल्या गावे/वाड्यामधील प्राथम्यक्रमानुसार येणाऱ्या गावे/वाड्यांमधील योजनांची कामे तसेच ज्या केंद्रीय सहाय्यित योजनांमध्ये

शासन सहभाग सक्तीचा करण्यात आलेला आहे अशा भौतिक दृष्ट्या पुर्णत्वाकडे आलेल्या योजनांची कामे पूर्ण करण्यासाठी प्राथम्याने खर्च करावयाचे आहे.

३) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, यांनी या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत. या शासन निर्णयातील अटी व शर्तीची व NRDWP या योजनेंतर्गत केंद्र शासनाने घालून दिलेल्या मार्गदर्शक सूचनांची संबंधित अंमलबजावणी यंत्रणांकडून पूर्तता होत आहे, याची शासनाला खात्री करून घेता यावी, यासाठी महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर यांना तसेच या विभागातील प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यांना लेखा परीक्षणाकरिता संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, कार्यालयाची पुस्तके व लेखे पाहण्याचा अधिकार राहील. तसेच महालेखापाल यांना त्यांचे काम योग्यरितीने पार पाडता यावे म्हणून संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, यांनी संपूर्ण मदत व सुविधा पुरवतील.

४) शासन परिपत्रक ग्रामविकास विभाग क्र.आरसीएन-१८९/सी.आर.३०२७/२८, दि. ५/९/९० मधील सुचनेप्रमाणे सदर अनुदानाच्या खर्चाचा महालेखापालकार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित दिनांकांना संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, यांनी विभागीय आयुक्त,(विकास शाखा) यांना व कार्यासन पापु-१०/पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सादर करावे. त्याचप्रमाणे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालय, मुंबई/नागपूर व पापु-१० कार्यासनास सादर करावे.

५) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार कव्हरेज यासाठी सर्वसाधारण घटकांतर्गत पाणी पुरवठा योजना राबविण्यासाठी याखाली हाती घेतलेल्या योजनांसाठीचा खर्च हा ५०% केंद्र निधीतून व ५०% राज्य निधीतून करणे आवश्यक आहे.

६) केंद्र व राज्य हिश्श्यातून केलेल्या खर्चाची नोंद न चुकता,IMIS या प्रणालीवर पुढीलप्रमाणे घेण्यात यावी तसेच सदर नोंदी पुढीलप्रमाणे वेळोवेळी अद्ययावत करण्यात याव्यात.

क. भौतिक दृष्ट्या १००% पूर्ण परंतु आर्थिक दृष्ट्या अपूर्ण योजना.

ख. > ७५ ते १००% < भौतिक दृष्ट्या पूर्ण.

ग. > ५० ते ७५% < भौतिक दृष्ट्या पूर्ण.

घ. > २५ ते ५०% < भौतिक दृष्ट्या पूर्ण.

७) सर्वप्रथम, राज्यातील सर्व जिल्हा परिषदांना यापूर्वी उपलब्ध करून देण्यात आलेल्या निधीमधून ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी करण्यात आलेला सर्व खर्च प्रथम आयएमआयएस प्रणालीवर अद्यावत करण्यात यावा.

८) सदर निधी सन २०१२-१३, २०१३-१४, २०१४-१५, २०१६-१७ व २०१७-१८ या वर्षाच्या कृती आराखड्यात समाविष्ट असलेल्या गावांच्या योजनांसाठीच खर्च करावा. तसेच उपलब्ध करून देण्यात आलेला निधी उपयोगात आणण्यासाठी कालबध्द कार्यक्रम आखून खर्चाचे नियोजन करावे व उपयोगिता प्रमाणपत्रे शासनास वेळीच सादर करावीत.

३. यावर होणारा खर्च मागणी क्र. वाय-०२, लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, १०२ ग्रामीण पाणभ पुरवठा कार्यक्रम, ०२ जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२) (०२५) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (केंद्र हिस्सा) यासाठी अनुदाने, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ ९७९१) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व तो सन २०१७-१८ साठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. वित्त विभाग परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि. ०२.एप्रिल २०१८ मधील परिच्छेद ७ ते ८ मधील अटींची तसेच सदर परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ८ मधील तपासणी सूचीतील अनुक्रमांक १ ते १० मधील अटींची पुर्तता होत आहे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक१५१/व्यय-३, दिनांक ११.०५.२०१८ च्या मान्यतेने व सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१८०८२४१६३९५७३०२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Vasant
Bhimrao Mane

Digitally signed by Vasant Bhimrao Mane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=280e2beac20f526041fee94f6226522e1407a7f6aa0b06c8769634d48c2976bc, cn=Vasant Bhimrao Mane
Date: 2018.08.27 15:01:33 +05'30'

**( वसंत भि. माने )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई(लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
२) महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर(लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
३) नियोजन विभाग (कार्यासन-१४४३)/वित्त विभाग(व्यय-३), मंत्रालय, मुंबई.
४) सर्व विभागीय आयुक्त,
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर,
६) उपमुख्य कार्यकारी अधिकारी(पाणी व स्वच्छता) सर्व जिल्हा परिषदा
७) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई.
८) संचालक, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नवी मुंबई.
९) कार्यकारी अभियंता, पाणी पुरवठा व स्वच्छता, जिल्हा परिषद, कोल्हापूर.
१०) जिल्हा कोषागार अधिकारी,कोल्हापूर.
११) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१२) मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई.
१३) पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासने क्र. पा.पु.४, पा.पु. २०.